**ओटाव ल. पा. प्रकल्प ता. कणकवली, जि. सिंधूदूर्ग या प्रकल्पाच्या रु.९९.४९ कोटी किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. लपायो -२०१५/(प्र. क्र.३४१/२०१५)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०८ मे, २०२३

**पहावे :-**

१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. लपायो २००६/(५७७/२००६)/खारभूमी, दिनांक १३/०१/२०११.

२) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम/तां.३/ओटाव सु.प्र.मा./३३०७/सन २०१५, दिनांक ०२/११/२०१५.

**प्रस्तावना:-**

ओटाव ल.पा.प्रकल्प हा सिंधुदूर्ग जिल्ह्याच्या कणकवली तालुक्यातील ओटाव गावाजवळ स्थानिक नाल्यावर बांधण्यात येत आहे.सदर प्रकल्प कोकण पाटबंधारे विकास महामंडळ अंतर्गत -उर्वरीत महाराष्ट्र या प्रदेशांतर्गत आहे. ७.५५ दलघमी एकूण पाणीसाठ्याच्या या प्रकल्पाद्वारे कणकवली तालुक्यातील ओटाव व नांदगांव या गावातील ५१८ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे.

सदर योजनेस शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो २००६/(५७७/२००६)/खारभूमी, दिनांक १३/०१/२०११ अन्वये रू. २५.०२ कोटी रकमेस दरसूची वर्ष २००५-२००६ नुसार तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. या प्रकल्पाचे सन २०१२-१३ च्या दरसूचीवर आधारीत रू. ७९.७९ कोटी किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावावर राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांच्या दि. १५/१०/२०१५ रोजी संपन्न झालेल्या ५९ व्या बैठकीत छाननी अहवालातील मुद्दा क्र. १ ते २७ च्या अनुपालनाच्या अधीन राहून शिफारस करण्यात आली आहे. तसेच दि.१२/०७/२०२१ रोजी संपन्न झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये सदर प्रस्ताव माननीय मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावा अशी शिफारस केली आहे. तसेच शासनाच्या दि.१७.११.२०२२ रोजीच्या पत्रातील सूचनेनुसार सदरचा प्रस्ताव जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२०२३ च्या दरसूचीने अद्यावत करण्यात आला आहे. त्यानुसार एकूण रु. ९९.४९ कोटी (दरसूची २०२२-२०२३) इतक्या किंमतीचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेच्या विचारार्थ सादर केला होता.

मा. मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, दरसूचीतील बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादि किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन ओटाव लघु पाटबंधारे योजना, ता. कणकवली, जि. सिंधुदूर्ग या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०२२-२०२३ वर आधारित रु. ९९.४९ कोटी किंमतीस चतुर्थ सुधारित

प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय दिनांक ०२ मार्च, २०२३ च्या मा.मंत्रिमंडळ बैठकीत घेतला आहे. त्यानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

ओटाव लघु पाटबंधारे योजना, ता. कणकवली, जि. सिंधुदूर्ग या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०२२-२०२३ वर आधारित रु. ९९.४९ कोटी किंमतीस ( अक्षरी रुपये नव्यान्नव कोटी एकोणपन्नास लक्ष) (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु. ८९.१९ कोटी (अक्षरी रुपये एकोणनव्वद कोटी एकोणीस लक्ष ) व अनुषंगीक खर्च रु. १०.३० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी तीस लक्ष ) किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१. प्रकल्प चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावा.
२. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही यासंदर्भात संबंधित महामंडळ कार्यालय व त्याअंतर्गत क्षेत्रीय कार्यालयांनी प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोर अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची सर्वस्वी जबाबदारी संपूर्णपणे संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.
३. सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर कांही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील,कोणतीही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती/मान्यता या प्रकल्पाबाबत दिलेली नाही. अशा प्रत्येक प्रकरणी व अशा प्रत्येक बाबीवर क्षेत्रीय कार्यालयांनी विहित कार्यपध्दती अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्याची, नस्ती सादर करुन अभिप्राय घेणे/मान्यता घेणे अत्यावश्यक राहील व ही सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.
४. सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही.तसेच सुधारित प्रशासकीय मान्यता देणारे प्राधिकारी हे झालेल्या क्षेत्रीय निर्णयास किंवा अनियमिततेस जबाबदार नसतील याबाबतची जबाबदारी निर्णय घेणाऱ्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहिल. अशा तांत्रिक व निविदाविषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी असलेल्या प्रचलित शासन नियमानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.१७५ /२०२१ , दिनांक २०/१०/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.३६६/२०२१, दिनांक २८/१०/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक ०२ /०३ /२०२३ रोजी झालेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता खारभूमी कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत ३ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५०८१७१३१८६७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ALKA HARISHCHANDRA AHIRRAO

Digitally signed by ALKA HARISHCHANDRA AHIRRAO
DN: CN = ALKA HARISHCHANDRA AHIRRAO, C = IN, S = Maharashtra, O = Personal
Date: 2023.05.08 17:16:06 +05'30'

**( अलका अहिरराव )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
९. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
१०. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग
११. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१२. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१४. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. सह सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१६. उप सचिव (ल पा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१७. अधिक्षक अभियंता, दक्षिण कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस - सिंधुदुर्गनगरी
१८. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१९. खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ).

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो - २०१५/(प्र. क्र.३४१/२०१५)/खारभूमी, दिनांक ०८ / ०५ /२०२३ चे परिशिष्ट)

### ओटाव ल. पा. प्रकल्प ता. कणकवली, जि. सिंधूदूर्ग
### चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता
### उपशिर्षनिहाय तरतूदी

| अ.क्र. | उपशिर्ष | चतुर्थ सुप्रमा नुसार तरतुद (दरसूची सन २०२२-२०२३) (रू. कोटी) |
|---|---|---|
| **अ) मुख्य धरण व कालवे** | | |
| १. | अे - प्राथमिक | ०.६२ |
| २. | बी - भूसंपादन | २२.१९ |
| ३. | सी - मुख्यकामे | ४१.६४ |
| ४. | डी - विमोचक | २.७३ |
| ५. | ई-फॉल्स | ०.११ |
| ६. | एफ. आर. एच. टी. | ११.७७ |
| ७. | जी-ब्रीजेस | ०.९४ |
| ८. | के - इमारती | ०.०३ |
| ९. | एल-मातीकाम | ६.७५ |
| १०. | एम - प्लान्टेशन | ०.२० |
| ११. | ओ - संकीर्ण | ०.०७ |
| १२. | पी - देखभाल | ०.०४ |
| १३. | आर - रस्ते | १.५६ |
| १४. | वितरण व्यवस्था | ०.५४ |
| | **एकूण शिर्षकामे** | ८९.१९ |
| **ब) अनुषंगीक खर्च** | | १०.३० |
| | **एकूण (अ+ब)** | ९९.४९ |

ALKA HARISHCHANDRA AHIRRAO
Digitally signed by ALKA HARISHCHANDRA AHIRRAO
DN: CN = ALKA HARISHCHANDRA AHIRRAO, C = IN, S = Maharashtra, O = Personal
Date: 2023.05.08 17:16:30 +05'30'

(अलका अहिरराव)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रकल्पाची ठळक वैशिष्ट्ये :-**

| | | |
|---|---|---|
| १. | ओटाव प्रकल्पाची सिंचन क्षमता :- | ५१८ हेक्टर |
| २. | प्रकल्पाचा एकूण पाणीसाठा :- | ७.५५ द.ल.घ.मी |
| ३. | लाभव्यय गुणोत्तर :- | ०.८५ (प्रचलित मापदंड १ पेक्षा अधिक) प्रकल्प मापदंडात बसत नाही. |
| ४. | आर्थिक परतावा दर :- | ६.९३ % ( प्रचलित मापदंड १२ % पेक्षा अधिक) प्रकल्प मापदंडात बसत नाही. |
| ५. | पाणीसाठा किंमत :- | रू. १,३१,७७६/- प्रति संघमी ( प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी ) प्रकल्प मापदंडात बसतो. |

ALKA HARISHCHANDRA AHIRRAO

Digitally signed by ALKA HARISHCHANDRA AHIRRAO
DN: CN = ALKA HARISHCHANDRA AHIRRAO, C = IN, S = Maharashtra, O = Personal
Date: 2023.05.08 17:16:47 +05'30'

(अलका अहिरराव)
उप सचिव,महाराष्ट्र शासन